# शाहाणपणाचा ओ ना मा

म्हणजे

## सांप्रतच्या स्थितीचें थोडेंसें ज्ञान.



हें पुस्तक

होतकरू तरुणांच्या उपयोगार्थ केलें आहे

मुंबईत,

जावजी दादाजी यांच्या

"निर्णयसागर" छापखान्याचे मालक तुकाराम

जावजी यांनी छापून प्रसिद्ध केलें.

इ० स० १८९४.

किंमत २॥ आणे.

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.

हा काल विचाराचा आहे. हारजीत जी काय व्हावयाची आहे, ती, निदान आमच्या राष्ट्रास तरी, विचारानें व्हावयाची आहे. दुसरें साधन नाहीं. ह्मणून, आमच्या होतकरू तरुणांस विचार करण्यास सध्याच्या स्थितींतल्या ठोकळ ठोकळ गोष्टी कळाव्या, ह्या हेतूनें हें लहानसें पुस्तक लिहिलें आहे. हा नुसता आरंभ आहे. हा जसा आमच्या मंडळीस रुचेल, तसा हा उद्योग पुढें चालवितां येईल.

ह्या उद्योगास परमेश्वर यश देवो.

# शाहाणपणाचा ओ ना मा.

## ज्ञान ह्मणजे काय?

मुलांनो,

ज्ञान ह्मणजे स्मरण. अमका एक माणूस मोठा ज्ञानी आहे, ह्याचा अर्थ असा कीं, त्याला पुष्कळ गोष्टींचें स्मरण आहे. असा साधारण समज आहे. त्याला धरूनच, सध्याच्या विद्वानांची व्याख्या होत असते, आणि ती व्याख्या अगदीं खोटी आहे असें नाहीं. पण, पुष्कळ गोष्टी आठवत असल्या ह्मणजे तो ज्ञानवान झाला, असें घेऊन चालणें बरोबर नाहीं. त्या गोष्टींप्रमाणें त्याची क्रिया पाहिजे. एकाद्या पोपटाला, मोठ्या श्रमानें, दाहा पांच हजार संस्कृत शब्द शिकविले, तर, तेवढ्यावरून त्याला कोणी विद्वान ह्मणणार नाहीं. तोच प्रकार माणसाला लागू आहे. पुष्कळ कळत आहे, आणि त्याप्रमाणें वागणें मुळींच होत नाहीं, तर तें कळणें व्यर्थ आहे. पोपटानें पाठ केलेल्या शब्दांसारखें आहे. ती अवस्था आमच्यांतल्या सुशिक्षितांस सध्या प्राप्त झाली आहे. काय करावें आणि तें कसें करावें, हें त्यांस ठाऊक झालें आहे. पाश्चिमात्य विद्येच्या संस्कारानें स्वराष्ट्रकल्याणाच्या पुष्कळ गोष्टी कळल्या आहेत, पण त्या त्यांस करवत नाहींत,— किंवा त्यांस करतां येत नाहींत, किंवा ते करीत नाहींत. कांहीं ह्मणा; पण त्या त्यांच्या हातून होत नाहींत ही

गोष्ट खरी आहे. असें कां झालें आहे, ह्याचें कारण इंदुप्रकाशकर्त्यांनीं एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, आह्मां लोकांस सांप्रत काळीं ज्ञान ह्मणून जें काय मिळत आहे, किंवा ज्याला आह्मी ज्ञान ह्मणून आपल्या संग्रहीं ठेवीत आहों, तें खरें ज्ञान नव्हे आहे; तें ज्ञानाचें सोंग आहे; सोनें समजून पितळ पदरांत घेत आहों. असें जर नसतें, तर, त्या ज्ञानाचा जो परिणाम इतर राष्ट्रांवर झालेला आपणांस दिसत आहे, तो आपणांवर झाला असता. अथवा, दुसऱ्या प्रकारें पाहिजे तर असें ह्मणावें कीं, आह्मी जमा करीत आहों, तें ज्ञान आहे खरें, परंतु आमच्या ठायीं जन्मतःच असा कांहीं एक दुर्गुण उत्पन्न 'झालेला आहे कीं, त्या ज्ञानाचें भलतेंच कांहीं आमचे ठायीं व्हावें. एकूण एकच. युरोपांतल्या विद्वानांत असें दृष्टीस पडतें कीं ते आपल्या विद्येच्या योगानें आपल्या देशाचें कांहीं तरी काम करितात, आणि त्याकरितां घस सोसतात. तसें आमचेकडे होत नाहीं. युरोपांतल्या विद्वानांपुढें आमच्या इकडच्या विद्वानांचें तेज पडत नाहीं. फिकें पडतें. दोघांजवळ माल एकसारखा असून, एकाचा उत्तम ठरावा, आणि एकाचा निरुपयोगी व्हावा, हें काय! ह्याचें उत्तर एवढेंच कीं, शब्दपांडित्य हें ज्ञान नव्हे. बुद्धीचें विशदत्व, आणि ज्ञानानुरूप वर्तन हें खरें ज्ञान आहे. तें अद्याप आमच्यांत आलें नाहीं. तें येण्यास बराच काळ लागतो. तें आमच्यांत येईल, तेव्हां आमची आणि पाश्चिमात्यांची बरोबरी होईल.

---

# आह्मी प्रजा कां आणि ते राजे कां ?

**मुलांनो,**

आमच्यांतल्या कांहीं लोकांस कधीं कधीं असें वाटतें कीं, हिंदुस्थान हा आमचा देश, असें असतां, ह्यांत सध्या माहात्म्य काय तें इंग्लिश लोकांचें, आणि आह्मी हिंदुस्थानांतले लोक ह्मणजे कांहींच नाहीं—निर्माल्य—असें कां असावें ? हा विचार चांगला, मनुष्यपणास शोभण्यासारखा आहे. पण, ह्या प्रश्नाचें उत्तर अगदीं थोडक्यांत आहे. तें एवढेंच कीं, ते शाहाणे आहेत, ह्मणून ते आमचे राजे झाले आहेत, आणि आपण अंजाण आहों—अज्ञान आहों—अजागळ आहों, ह्मणून त्यांची प्रजा झालों आहों. आतां, कोणी असें ह्मणतात कीं, त्यांस काळ अनुकूल आहे. आह्मी ह्मणतों, असेल. पण, तो अनुकूल तरी शाहाणपणानेंच झाला असला पाहिजे. दुनया मोकळी आहे. सामर्थ्य असेल त्यानें पराक्रम करून दाखवावा, आणि उन्नति प्राप्त करून घ्यावी. इंग्लिशांनीं हिंदुस्थान घेतलें, तसें हिंदूंनीं इंग्लंड कां नाहीं घेतलें ? इंग्लिश लोक व्यापाराला ह्या देशांत आले, तसे हिंदु लोक व्यापाराला इतर देशांत कां नाहीं गेले ? इंग्लिश लोक ह्या देशाच्या राज्यकारस्थानांत पडले, तसे हिंदु लोक इंग्लंडच्या कारस्थानांत कां नाहीं पडले ? त्यांचे कोणीं हात धरले होते काय ? आणखी अशा कामांत कोणी कोणाचे हात धरून ऐकत असतो काय ? हिंदु लोकांस बाहेर

देशीं जाण्याचें कारण नव्हतें; आणखी त्यांस परदेशीं जाण्याची मनाई त्यांच्या धर्मानें केली आहे, ह्मणून असें झालें. होय, कदाचित् तसें असेल. पण, तेवढ्यावरून त्यांचा कमीपणा कमी होत नाहीं. कारण कांहींही असो, कार्य जें झालें आहे, तें निर्विवाद आहे; आणि तें भोगणें माणसांस टळत नाहीं. ह्मणून सांगायाचें एवढेंच कीं, ते आमच्यापेक्षां श्रेष्ठ कां, असें ह्मणून उगाच आपले ठायीं कुढत आणि मुरडत बसूं नये. ते श्रेष्ठ आहेत, ह्मणूनच ते श्रेष्ठ आहेत, हें त्याचें उत्तर आहे. ह्मणजे ते खरोखर आह्मांपेक्षां अधिक शाहाणे आहेत, ह्मणून ते आमचे राज्यकर्ते झाले आहेत. त्याविषयीं कुरकुरण्यांत आणि दुसऱ्यास दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. दुनयेच्या व्यवहारामध्यें साधवतें तो आपलें हित साधीत असतो; सोडीत नाहीं. आणखी ज्यांस आपलें हित साधतां येत नाहीं, त्यांस खालीं राहावें लागतें. तेथें उपाय नाहीं. तेल पाणी एक झालें, ह्मणजे तेल वर यावयाचें आणि पाणी खालीं राहावयाचें, त्यांत कधीं अंतर पडावयाचें नाहीं; त्याप्रमाणें, शाहाणे असतात ते श्रेष्ठत्व पावावयाचे, आणि अज्ञान असतात ते त्यांच्या पायांखालीं लोळावयाचे, हें नेहमीं चालावयाचें आहे. त्यांत कधीं चूक यावयाची नाहीं. ह्मणून कुरकुरण्यांत आणि कुढण्यात वेळ न खरचितां, ज्ञानश्रेष्ठता मिळविण्याच्या मार्गांत अखंड श्रम करीत असावें, ह्मणजे त्यामध्यें केव्हां तरी इष्ट कार्य सिद्धीस जाईल, असा निश्चय ठेवावा. यश देणें परमेश्वराकडे आहे.

---

# हिंदुस्थानांतले शेतकरी.

मुलांनो,

आपल्या ह्या हिंदुस्थान देशांत शेतकी मोठी आहे. इतकी शेतकी दुसऱ्या कोणत्याही देशांत नाहीं. अनुमान असें निघालें आहे कीं, हिंदुस्थानांतलीं शेंकडा ऐशीं माणसें शेतकीवर आपलें उपजीवन करीत आहेत. ह्या शेतकीचा मूळपाया ह्मणजे जमीन होय. हिजमध्यें जें पीक पूर्वी येत असे, त्याची पाहाणी करून, त्याच्या उत्पन्नाचा कांहीं अंश पूर्वींचे राजे घेत असत; आणि कधीं कधीं ते उत्पन्न झालेले पदार्थ देखील घेत असत. परंतु, इंग्रज सरकारानें तें सारें बदललें आहे. सगळ्या जमिनीची मोजणी केली आहे; तींत प्रती लाविल्या आहेत; आणि त्यांजवर सारा बसविला आहे. तो सारा, पीक येवो कीं न येवो, दोन हापत्यांनीं शेतकऱ्यानें रोकडीनें दिलाच पाहिजे, आणि न दिल्यास त्याजपासून व्याज घ्यावयाचें, असें ठरविलें आहे. शिवाय ही मोजणी तीस तीस वर्षांनीं होत असते. तेव्हां जमिनीचा सारा दुप्पट दुप्पट तिप्पट तिप्पट वाढत जातो. आणखी, जंगलावर सरकाराचा सक्त पाहारा असल्यामुळें, शेतकऱ्यांस बैल चारण्यास, आणि लांकूड फांटें मिळविण्यास अतिशयित कठिण पडतें. ह्या योगानें सध्या शेतकऱ्यांस अतिशयित ताप होत असतो. शिवाय, आमचे शेतकरी ह्मणजे अगदीं अज्ञाणी—हिशेबठिशेबाच्या नांवानें भोपळ्याएवढें शून्य—त्यांस साव-

कार—आणि त्यांतही विशेषेंकरून मारवाडी—गूळनो पैशो आणि पैशोनो गूळ करून—फसवितात. ह्यामुळें आमची शेतकरी मंडळी दरिद्री आहे. तिजवर सावकारांचा जुलूम चालूं नये—त्यांनीं अव्वाचे सव्वा पैसे शेतकऱ्यांपासून घेऊं नयेत—ह्मणून सरकारानें वेगळा कायदा केला आहे, आणि त्या कामावर एक वेगळा जडज नेमिला आहे. हा उपाय कोणी चांगला ह्मणतात, कोणी वाईट ह्मणतात. पण, ह्याचा कांहीं उपयोग व्हावा तसा होत नाहीं, हें खरें आहे. असे शेतकऱ्यांचे हाल होऊं नयेत, ह्मणून त्यांस पैसे थोड्या व्याजानें देण्याकरितां सरकारानें पेढ्या काढाव्या, असा विचार कोणीं काढिला होता. परंतु, तो तसाच मागें पडला आहे. ह्या अशा उपायांनीं आमच्या शेतकऱ्यांची स्थिति सुधारायाची नाहीं. किती झालें तरी, माणसास दुसरा किती संभाळील ? ज्याचें त्यानें आपणास संभाळिलें पाहिजे. शेतकरी शाहाणे होऊन त्यांनीं आपलें हित साधिलें पाहिजे. दुसरा मार्ग नाहीं. हें आमच्या सरकारानें लक्षांत आणिलें पाहिजे. पण तें आपोआप यावयाचें नाहीं. आमच्या समंजस मंडळीनें शेतकऱ्यांस हाताशीं धरून हा उद्योग केला पाहिजे. ह्मणजे शेतकऱ्यांमध्यें ज्ञानाचा प्रसार होईल असें केलें पाहिजे, आणि शेतकरी विपत्तींत आहेत, असें सरकाराच्या मनांत भरविलें पाहिजे. स्वस्थ बसून उपयोगीं नाहीं.

---

# हिंदुस्थानाचें संरक्षण.

मुलांनो,

हिंदुस्थानांतल्या इंग्लिशांच्या राज्यास आंतले आंत आतां कांहीं भय राहिलें नाहीं. जे थोडेबहुत राजेरजवाडे राहिले आहेत, ते इंग्लिश सरकाराचे अंकित आहेत. त्यांजवर इंग्लिश सरकाराची सक्त नजर आहे. आणि ते सगळे असें समजत आहेत कीं, आपल्या स्वास्थ्यास इंग्लिश राज्याधिकार अतिशयित आवश्यक आहे. ह्मणून ते सगळे इंग्लिश सरकाराशीं एकनिष्ठेनें वागतात. हें सगळें आंतल्या बाजूनें ठीक झालें. परंतु, बाहेरून भय आहे. तें एकाच दिशेनें आहे. तें वायव्य दिशेकडून आहे. तें असें:—अफगाणिस्थानच्या गादीवर सध्या अबदुलरहिमान ह्मणून एक अमीर आहे. ह्यानें पूर्वी बंड उभारलें होतें. तें त्याचा चुलता शेरअल्ली ह्यानें मोडून त्यास पळायास लावलें. तेव्हां तो रशियाच्या आश्रयास जाऊन राहिला. तरी, पुनः तो इ० स० १८७९ ह्या वर्षी अफगाणिस्थानांत परत आला, आणि त्यानें तेथल्या दरबारी लोकांशीं राजकारण करून तेथली गादी मिळविली. आणखी त्याच्या पुढच्या वर्षी ह्मणजे इ० स० १८८० ह्या वर्षी हिंदुस्थान सरकारानें त्याला अफगाणिस्थानचा राजा असा कबूल करून, त्यानें नेहमीं आपणाशीं स्नेहभावानें राहावें, बिघरूं नये, ह्मणून त्यास दरसाल वीस लाख रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें. त्याप्रमाणें व्यवस्था आजपावेतों

चालली आहे. ही खंडणी देऊन अबदुलरहिमानास संतुष्ट ठेवण्याचें अंतर्गत कारण असें आहे कीं, पीटर धी ग्रेटच्या वेळेपासून, रशियाचा डोळा हिंदुस्थानावर आहे. रशियास हिंदुस्थान पाहिजे आहे. आणखी रशिया हा मोठा बलवान असून, त्याच्या राज्याच्या आणि हिंदुस्थानाच्या दरम्यान अफगाणिस्थान आहे. तें अबदुलरहिमानाचें आहे. आणखी अबदुलरहिमान हा पहिल्यापासून रशियाचा आश्रित—रशियाचें अन्न खाल्लेला—आहे, तो वेळेस जर रशियास मिळाला, तर त्याला हिंदुस्थानांत येण्याचा मार्ग मोकळा होऊन, शिवाय पुष्कळ अफगाण लोकांचें सैन्य मिळेल; आणि तसें झालें तर अनर्थ ओढवेल. अशी मोठी भीति आहे. ह्याकरितां त्यास फार आर्जवून ठेविला आहे. त्याजकडे भेटायास लार्ड राबर्ट हे हिंदुस्थान सरकारच्या वर्तानें जायास निघाले होते. त्यांची भेट त्यानें घेतली नाहीं. आतां, दुसरे कोणी सरदार तिकडे जाऊन अबदुलरहिमानास भेटले आहेत. तिचें काय होतें पाहावें. बाकी, मध्यएशियांत रशिया पुढें पुढें येत चालला आहे, हें एक फार मोठें भय इंग्लिश सरकारास आहे. ह्याचें निवारण करण्याचा अत्यंत सुलभ आणि उत्तम उपाय हा आहे कीं, इंग्लिश सरकारानें हिंदुस्थानांतल्या लोकांस संतुष्ट ठेवून आपलेसे करून घ्यावें. ह्मणजे दाहा रशिये एकत्र झाले, तरी त्यांच्यानें कांहीं होणें नाहीं.

---

# आपण कोणता इतिहास वाचावा?

मुलांनो,

इतिहास हा एक महासागर आहे. त्याचें आकलन करण्यास मनुष्याचें आयुष्य पुरावयाचें नाहीं. परंतु, मनुष्याच्या तारणाचे उपाय त्यांत भरले आहेत. ह्मणून, त्याचें आकलन केलें पाहिजे. तें कांहीं निवड करून करावें, ह्मणजे सुसाध्य होईल. ती निवड सध्या एवढीच आहे कीं, आपली सांप्रतची स्थिति सुधारायास तात्काल उपयोगीं पडेल, तो इतिहास शिकावा. तर मग असा इतिहास कोणता? आपल्या हिंदुस्थानाचा काय? नव्हे. त्यांत, आह्मी कसे दुर्दशेस मिळालों आहों, ह्याची कथा सांगितली आहे. ती शिकून काय करायाचें आहे? तर, सध्या आपणांस, व्यापारसंबंधानें आणि राजकीय संबंधानें युरोपियन लोकांशीं, आणि त्यांत निकटत्वानें इंग्लिशांशीं सामना करावयाचा आहे. ह्मणजे, पर्यायेंकरून असें ह्मणावयाचें कीं, आपणांस पुष्कळ अंशीं इंग्लिश व्हावयाचें आहे. आपण इंग्लिश होऊं तेव्हांच आपणांस इंग्लिश सरकाराच्या हातून आपलीं कामें करून घेतां यावयाचीं आहेत; इतर कोणत्याही साधनानें तीं करून घेतां यावयाचीं नाहींत. ह्मणून आपणांस इंग्लंडाचा ह्मणजे इंग्लिश लोकांचा इतिहास विशेष पाहिला पाहिजे. हे लोक बारा चौदाशें वर्षांमागें अगदीं अडाणी होते. ते, इतक्याशा अवकाशांत इतके शाहाणे कसे झाले, त्यांनीं आपल्यांतला वेडसरपणा कसा घालविला, चांगल्या रीति आपणांत कशा चालू केल्या,

राजांचा हटवादीपणा कसा मोडिला, आपलें वर्चस्व राजांवर कसें स्थापिलें, राजा जुलुमी झाला तेव्हां त्याचें पारिपत्य कसें केलें, आपले हक्क राजापासून कसे घेतले, राजानें राज्यकारभार लोकांच्या सल्ल्यानें चालविला पाहिजे असें कसें केलें, आणि कोणत्या उद्योगांनीं आपलें राष्ट्र उन्नतावस्थेस आणिलें आहे, हें सगळें त्यांत उत्तम रीतीनें वर्णिलें आहे. ह्मणजे उन्नतीचा धोपटमार्ग पृथ्वीच्या पाठीवरच्या सगळ्या राष्ट्रांस दाखविला आहे—तो इतिहास आपण पाहिला असतां, अथवा त्या इतिहासामध्यें जो आवेश आहे, त्याचा प्रवेश—मग तो अगदीं थोडा कां होईना—आपले अंगांत झाला असतां—आपल्या राष्ट्राचें एक मोठें कार्य होणार आहे. ह्मणून, आपणांस जर इतिहास वाचायाचाच आहे—आपणांस जर इतिहासाचा अभ्यास करावयाचाच आहे—तर इंग्लंडाच्या किंवा त्यासारख्या पाश्चिमात्य उन्नत राष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास आपण करावा. आतां शिवाजी किंवा निजाम उल्मुल्क, किंवा हैदर नाईक होण्याचा वेळ नाहीं आहे. शिवाजीनें तोरणा किल्ला घेतल्याची खबर विजापुरकरांस कळण्यास साहा महिने लागले, तशी वेळ आतां नाहीं आहे. ह्मणून त्या वेळाचा इतिहास आतां उपयोगीं पडावयाचा नाहीं. परंतु, राज्यकर्त्यांनीं आपलें ऐकावें, असें करण्यास इंग्लिशांनीं काय केलें, हें जर आपणांस चांगलें कळलें, तर त्या नमुन्यावर आपणांस कांहीं उद्योग करितां येईल, अशी आशा आहे. ह्मणून आह्मीं इंग्लंडचा इतिहास शिकावा.

# हिंदुस्थानाची राजकीय स्थिति.

मुलांनो,

आपल्या ह्या हिंदुस्थानाची राजकीय स्थिति सध्या जशी आहे, तशी पूर्वी कधींच नव्हती. ह्मणजे इतकी चांगली कधीं नव्हती; आणि एका प्रकारें इतकी वाईटही कधीं नव्हती. ह्या दोन गोष्टी विरुद्ध कशा, त्या ऐका.

हिंदुस्थानांत इंग्लिशांचें राज्य झालें आहे. त्यापासून हिंदुस्थानास पुष्कळ लाभ झाले आहेत. त्यांतले कितीएक लाभ तर असे आहेत कीं, ते लाभ, आमचें स्वराज्य आजपर्यंत येथें चालत आलें असतें, तरी ते कधीं प्राप्त झाले नसते. देशांत सर्वत्र शांतता आहे; जीव आणि जिनगी ह्यांचें अत्युत्तम संरक्षण होत आहे; लोकांत विद्येचा प्रसार होत आहे; धर्म आणि व्यवहार ह्यांच्या संबंधानें प्रत्येक समंजस माणसास पूर्ण स्वातंत्र्य आहे; एकंदर जगांतल्या राष्ट्रमंडळांत आपल्या राष्ट्राची खरी योग्यता काय आहे, हें कळूं लागलें आहे; आणि राष्ट्रास उत्तमावस्था प्राप्त होण्यास कोणते उपाय आपणांस केले पाहिजेत, ही दिशा दिसूं लागली आहे; हे लाभ अप्रतिम आहेत. ह्यांबद्दल आपण सर्वांनीं इंग्लिश सरकारचे फार फार आभार मानावे, आणि परमेश्वराची अशी प्रार्थना निरंतर करावी कीं, हें राज्य आमच्या राष्ट्रावर अखंड असो.

आतां ह्या राज्यापासून हानि कोणती झाली आहे ती पहा. आमचीं स्वराज्यें नाहींतशीं झालीं; त्यामुळें आमच्या

लक्षावधि लोकांचा आधार तुटला; ज्यांचे पूर्वज पालखी-पदस्थ होते, ते आतां भीक मागत आहेत; आमच्या राष्ट्राच्या राज्यांत मोठमोठ्या सरकारी जागा परक्यांनीं भरल्या आहेत; त्या आमच्या हातास लागायाची आशा नाहीं; परके लोक आमचे राजे, आणि आह्मी रंक, असें झालें आहे; आह्मांवर राजकृपा नाहीं; कांकीं, आह्मी बोलून चालून परक्यांचीं मुलें आहोंत; आह्मांवर करांचें ओझें मनस्वी झालें आहे; त्यानें आह्मी ओरडतों आहों—गायां वायां करीत आहों—काकुळतीस येत आहों—तरी आमचेकडे कोणी पाहात नाहींत; आह्मांजवळचीं सगळीं शस्त्रें प्रभूंनीं घेतलीं आहेत; व्याघ्र सिंहांपासून आपलें रक्षण करण्यास आमच्याजवळ कांहीं नाहीं; आणखी, जेवायास बसलेल्या मोठ्या श्रीमंत माणसापुढच्या परक्या मांजराप्रमाणें आमची सगळी अवस्था झाली आहे. परके देतील तें घ्यावें, आणि ठेवतील तसें राहावें, अशी अवस्था प्राप्त झाली आहे. इतकी दीनावस्था आजपर्यंत जगांत दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रास आली नव्हती. हींतून मुक्तता करून घेण्यास आपणास महत्प्रयास केले पाहिजेत. ते कोणत्या दिशेनें करावयाचे, तें आपल्या सध्याच्या विद्याचारसंपन्न कृपाळू राज्यकर्त्यांच्या प्रसादानें आपणांस कळूं लागलें आहे. सामाजिक सुधारणा हा इतर सगळ्या सुधारणांचा पाया आहे, हें चांगलें कळलें आहे. ह्मणून आधीं ती करायास यथाशक्ति सर्वांनीं झटलें पाहिजे.

---

# सुधारक आणि असुधारक.

मुलांनो,

सांप्रतकाळीं आपल्या ह्या देशांतल्या सुजाण लोकांत दोन पक्ष झाले आहेत; सुधारक आणि असुधारक; किंवा नव्या मतांचे आणि जुन्या मतांचे. त्यांचीं मतें एकमेकांशीं अगदीं विपरीत आहेत. त्यांतलीं कांहीं येथें सांगतों:—

| सुधारकमतें. | असुधारकमतें. |
|---|---|
| १. सगळे धर्म सारखे आहेत. | १. आपला धर्म मात्र खरा आहे. |
| २. आपल्या देशाच्या बाहेर जाण्यास प्रत्यवाय नाहीं. | २. आपल्या देशाच्या बाहेर कांहीं झालें तरी जाऊं नये. |
| ३. मुलांचीं लग्नें लहानपणीं करूं नयेत. | ३. मुलांचीं लग्नें लहानपणींच करावीं. |
| ४. विधवाविवाह करावे. | ४. विधवाविवाह करूं नयेत. |
| ५. आपल्या चालीरीतींत फेरफार करून त्या सुधराव्या. | ५. आपल्या चालीरीतींत फेरफार करूं नयेत. |
| ६. स्त्रियांस पुरुषांप्रमाणें स्वातंत्र्य असावें. | ६. स्त्रियांस स्वातंत्र्य असें कधीं देऊं नये. |
| ७. स्त्रियांस पुरुषांप्रमाणें विद्या शिकवाव्या. | ७. स्त्रियांस पुरुषांप्रमाणें विद्या शिकवूं नयेत. |
| ८. आपल्या रीतिभाती आपल्याच्यानें सुधारवत नाहींत, त्यांत सरकारास कायदा करूं द्यावा. | ८. कसाही प्रसंग आला तरी सरकारास आपल्या रीतिभातींविषयीं कायदा करूं देऊं नये. |
| ९. अर्थ न समजतां वेदासारखे ग्रंथ पाठ करणें हे श्रम व्यर्थ आहेत. | ९. अर्थ कळो कीं न कळो, वेद पाठ करणें हें कर्तव्य आहे. |

| सुधारकमतें. | असुधारकमतें. |
|---|---|
| १०. धर्मांत आणि रीतिभातींत जो फेरफार आवश्यक वाटेल, तो एकदम करावा. तें पाप नव्हे. | १०. धर्मांत आणि रीतिभातींत फेरफार करण्याच्या भरीस आपण कधीं पडूं नये; कां कीं तें पाप आहे. |
| ११. सामाजिक सुधारणा हा इतर सुधारणांचा पाया आहे. | ११. सामाजिक सुधारणेचा संबंध इतर सुधारणांशीं नाहीं. |
| १२. पाश्चिमात्य विद्या चांगल्या आहेत. | १२. आपल्या विद्या चांगल्या आहेत. |
| १३. सद्गुणांत आपण पाश्चिमात्यांचें अनुकरण करावें. | १३. आपण कधीं कोणाचें अनुकरण असें करूं नये. |

अशीं त्यांची मतें आहेत. त्यामुळें त्यांच्यांत सख्य नाहींसें झालें आहे; आणखी हा मतभेद होण्यास कारण विद्या आहे. बाप असुधारक आणि मुलगा सुधारक, अशी दुफळी एका कुटुंबांत आढळते. आणि तीच दुफळी वाढून, लोकांत दोन पक्ष झाले आहेत. यांतल्या अमक्या पक्षास तुम्हीं मिळावें, असें सांगणें हें कोणासही प्रशस्त नाहीं. कां कीं, हा सगळा ज्ञानप्रसाराचा परिणाम आहे. तो लोकांत आपोआप व्हावयाचाच आहे. म्हणून, त्याविषयीं बापानें मुलावर किंवा मुलानें बापावर रागावण्याचें किंवा त्याचा द्वेष करण्याचें प्रयोजन नाहीं. जी गोष्ट स्वाभाविकपणें घडत आहे—डोळे उघडले कीं दिसूं लागत आहे अथवा डोळे मिटून बसल्यावर सगळा अंधेर वाटत आहे,—त्याचें निवारण कोणाच्यानेंही व्हावयाचें नाहीं. तरी डोळे उघडून चालावें, हें विशेष चांगलें आहे.

## राष्ट्रीय सभा.

मुलांनो,

सध्या आपणांवर इंग्रजांचें राज्य आहे. ह्या लोकांच्या राज्यपद्धतीचीं अनेक तत्वें आहेत. त्यांत एक तत्व असें आहे कीं, राज्यामध्यें पुष्कळांस पुष्कळ सुख होईल तें राजानें करायास पाहिजे. आतां, पुष्कळांस पुष्कळ सुख कशानें होईल, हें सांगायास एकटादुकटा माणूस उपयोगाचा नाहीं; पुष्कळ माणसें पाहिजेत, आणि तीं शाहाणीं पाहिजेत. तशीं आपल्या देशांतलीं पुष्कळ शाहाणीं माणसें एकत्र व्हावीं, आणि त्यांनीं एकवाक्यतेकरून, सगळ्या देशाचीं मागणीं सरकाराजवळ मागावीं, अशी तजवीज योजण्यास ही राष्ट्रीय सभा काढिली आहे. हींत सर्व जातींचे शाहाणे शाहाणे लोक असतात; आणि ते देशांतल्या लोकांनीं आपापल्या वतीनें पाठविलेले असतात. पहिली राष्ट्रीय सभा मुंबई येथें इ० स० १८८५ च्या दिसेंबर महिन्यांत भरली; ती आज आठ वर्षें प्रति दिसेंबरांत वेगळ्या वेगळ्या जागीं भरत आली आहे; आणि यंदांची सभा लाहोर येथें भरायाचें ठरलें आहे. ह्या सभांत सगळ्या राष्ट्राच्या हिताच्या विषयांचा विचार होत असतो. त्यांतले कांहीं विषय सांगतों:—

१. गव्हरनर जनरलाच्या व गव्हरनरांच्या कौंसलांचे सभासद लोकांकडून निवडून घ्यावे.

२. देशाच्या रक्षणाच्या कामीं युरोपियनांच्या बरोबरीनें ह्या देशांतल्या लोकांवर विश्वास ठेवावा; म्हणजे

लष्करांत गोरे लोकांप्रमाणें काळ्या लोकांस मोठ्या जागा द्याव्या. प्रजाजनांस शस्त्रें बाळगण्याची मोकळीक असावी.

३. एक कमिशन नेमावें, आणि हिंदुस्थानाचा राज्यकारभार कसा चालला आहे, तो त्याजकडून चौकसून पाहावा. न्यायाचें आणि बजावणीचें हीं दोन कामें करण्यास वेगळे अमलदार असावे; हीं दोन कामें एकाचे हातीं असू नयेत. जूरीनें चौकशी करण्याची पद्धत चोहींकडे चालू करावी.

४. लष्कराचा खर्च कमी करावा; कलाकौशल्याचें शिक्षण द्यावें; मिठावरची जकात कमी करावी; आयात मालावरची जकात उठविली आहे ती पुनः बसवावी; आणि हिंदुस्थानांतल्या कारखान्यांस जो माल लागतो तो हिंदुस्थानांतला घेववेल तितका घेण्याविषयीं तजवीज करावी.

हे सगळे विषय फार अगत्याचे आहेत. हे सरकारानें मान्य केले तर आपल्या सगळ्या देशास फार लाभ होण्याची आशा आहे. आणि त्यांच्या योगानें आपला देश इतर विद्याचारसंपन्न राष्ट्रांच्या पंक्तीस येऊन बसेल, असा भरंवसा आहे. ह्यास आधार असा आहे कीं युरोपखंडांत अशा प्रकारच्या उद्योगांनीं राज्यकर्त्यांस आणि प्रजाजनांस सुख पुष्कळ झालें आहे. आणखी, ह्या सभेच्या खटपटीनें आलीकडे कौंसलांत आमचे पुष्कळ लोक घेण्याचा कायदा सरकारानें केला आहे. हें सुचिन्ह आहे. ह्मणून कायावाचामनेंकरून ह्या सभेस साह्य करणें हें आपलें सर्वांचें काम आहे.

## अनेक धर्म.

मुलांनो,

पृथ्वीवर धर्म अनेक आहेत. त्यांत हिंदु, मुसलमानी, खिस्ती, आणि बौद्ध, हे मुख्य आहेत. ह्यांचीं धर्मपुस्तकें वेगळीं वेगळीं आहेत. हिंदूंच्या धर्मग्रंथास वेद ह्मणतात; मुसलमानांच्या धर्मग्रंथास कुराण ह्मणतात; खिस्ती लोकांच्या धर्मग्रंथास बैबल ह्मणतात; आणि बौद्धांचा धर्मग्रंथही वेगळा आहे. ह्यांत त्या त्या धर्माचें प्रतिपादन केलेलें आहे; आणखी ते सगळे परमेश्वरप्राप्तीचे मार्ग आहेत, असें प्रतिपादन केलें आहे. त्यांत कांहीं धर्मास स्वतःचा अभिमान मनस्वी आहे. मुसलमानी धर्मांत असें मत आहे कीं, तो धर्म खेरीजकरून इतर धर्मांनीं जे कोणी चालतात, ते नास्तिक आहेत. खिस्तीधर्म असें ह्मणतो कीं, परमेश्वरप्राप्तीचा खरा मार्ग काय तो येशू खिस्त आहे; इतर सगळे व्यर्थ आहेत. हिंदु धर्म असें ह्मणतो कीं, प्रत्येक माणसास त्याचा जन्मधर्मच श्रेयस्कर आणि हितावह आहे; परधर्म भयावह आहे. अशीं हीं मतें चाललीं आहेत. ह्यांपैकीं, सांप्रतच्या सुशिक्षितांस अमुकच मत ग्राह्य आहे, असें सांगतां येत नाहीं. तरी, कोणता तरी धर्म माणसास पाहिजे आहे, आणि ज्याला जो धर्म चांगला वाटेल, तो त्यानें धरावा, असें त्यांस वाटतें. सध्या खिस्ती धर्माचा प्रसार होत चालला आहे. ह्यांत कांहीं नवल नाहीं. तो राजसत्ताधाऱ्यांचा धर्म आहे हें एक; आणि पाणी जरा एकाच ठिकाणचें आण-

लेलें असलें, तरी, चकचकीत भांड्यांतलें पाणी पिण्याविषयीं माणसांस प्रवृत्ति व्हावी, आणि मळकट भांड्यांकडे त्यांस पाहू नयेसें वाटावें, हें साहजिक आहे. कोणी धर्मांतर करीना कां, त्यांतला मुख्य हेतु जर केवळ ईश्वरप्राप्ति आहे, आणि ईश्वरप्राप्तीशिवाय दुसऱ्या कोणत्याही हेतूचा एक लेश त्यांत नाहीं, असें जर खरें आहे, तर त्या धर्मांतरांत कांहींएक पाप नाहीं. कां कीं, तो सगळा प्रकार परमेश्वरप्रीत्यर्थ आहे. परमेश्वर सर्व जगाचा एक आहे; आणि तो करुणासमुद्र आहे; तेव्हां, मनुष्य कोणत्याही मार्गानें त्यास भजो, तो त्याला आपणाजवळ घेईल, ह्यांत काय संशय आहे? आणखी धर्माच्या कामांत आग्रह धरणें हें कल्याणकारक नाहीं. धर्माच्या आणि आचाराच्या संबंधानें स्वातंत्र्य असावें, जुलूम कोणावरही नसावा, हें एकंदर राष्ट्रांच्या कल्याणास उत्तम साधनभूत आहे, असें मोठमोठ्यांचें मत आहे. आणि ह्मणूनच, इंग्लिश सरकार हिंदुस्थानांतल्या लोकांच्या धर्मांत कधीं हात घालीत नाहीं. एवढेंच केवळ नव्हे. तर ते आपसांत देखील तो भेद पाहत नाहींत. महाराणी सरकार ख्रिस्तीधर्मांतल्या प्राटेस्टंट पंथांतल्या आहेत. तरी, लार्ड रिपन हे ख्रिस्ती धर्मांतल्या रोमनक्याथोलिक पंथांतले असतांही त्यांस त्यांनीं हिंदुस्थानाचे गव्हरनर जनरल नेमिलें होतें. त्यांचे मुख्य प्रधान लार्ड बीकन्सफील्ड, हे तर यहुदी होते. धर्मौदार्य हें कल्याणास आवश्यक आहे.

---

# हिंदुस्थानाची राजसत्ता.

मुलांनो,

ह्या आपल्या देशाचें नांव हिंदुस्थान आहे. ह्यांत फार प्राचीन काळीं काळे रानटी लोक राहात असत. त्यांचेच वंशज भिल्ल कोळी हे आहेत. त्या रानटी लोकांवर, आग्नेयीकडून येऊन, आर्य लोकांनीं स्वारी केली, आणि हा देश जिंकिला. त्या आर्यांचे वंशज आपण हिंदुलोक आहोंत. आर्यांच्या मागून हिंदुस्थानावर मुसलमान लोक आले. त्यांनीं आर्यांस जिंकून आपली राजसत्ता स्थापिली. त्यांच्या मध्यें हुमायून, अकबर, औरंगजेब इत्यादि कितीएक मोठे बादशाहा होऊन गेले. त्यांच्या राज्यांत, मराठे लोकांमध्यें, शिवाजी ह्या नांवाचा पराक्रमी पुरुष उत्पन्न होऊन, त्यानें हिंदूंचें राज्य स्थापित केलें. तें कांहीं दिवस चालल्यावर, त्यांची राजसत्ता, त्यांचे प्रधान पेशवे ह्यांनीं आपले हातीं घेतली. त्या पेशव्यांमध्यें पहिले बाजीरावसाहेब, माधवरावसाहेब इत्यादि कितीएक पुरुष पराक्रमी झाले. त्यांच्या कारकीर्दीची भरभर चालली असतां, व्यापाराकरितां, युरोपखंडांतून डच, फ्रेंच, इंग्लिश इत्यादि अनेक लोक आले. तेव्हां ह्या देशांतले मुसलमान राजे आणि हिंदुराजे एकमेकांचा द्वेष करीत होते, आणि एकमेकांशीं लढून एकमेकांचा नाश करायास पाहात होते, आणि एकमेकांशीं लढत होते. ही संधी उत्तम पाहून, इंग्लिश लोकांनीं, त्या भांडणांत पडून, आणि युक्तीनें सगळ्यांवर

छाप बसवून, आपलें राज्य स्थापिलें. व्यापार करतां क-रतां, आमच्या राजांस आपल्या अंगच्या गुणांनीं वश करून घेऊन, त्यांजपासून नानाप्रकारचे हक्क त्यांनीं मिळ-विले. आणि ते हक्क वाढतां वाढतां, त्या हक्कांस राजस-त्तेचें स्वरूप प्राप्त झालें. इंग्लिश लोक सावकार होते, ते सरकार झाले. ह्या वाढीचा प्रतिकार आमच्या राजांच्यानें करवला नाहीं. आणि इत्तीपुढें इतरांचें चालूं नये हें सा-हाजिक आहे. ह्या इंग्लिश राज्याचा पाया त्यांच्यांतल्या लार्ड क्लैव्ह ह्या नांवाच्या पुरुषानें घातला. त्याची कथा वाचली ह्मणजे असें वाटतें कीं, खारकांच्या पोत्यांत सहज हात घातला, तों तेथें कोहिनूर सांपडला ! ! ह्या इंग्लिश राज्याच्या पराक्रमापुढें ह्या देशांतल्या लोकांचीं राज्यें बहुतेक नाहींतशीं झालीं आहेत. आणि आतां हिंदुस्थानाची सगळी राजसत्ता, इंग्लंडदेशाच्या महाराणीसाहेब व्हिक्टोरिआ ह्यांच्या हातीं आहे. आणि आपण सगळ्या त्यांच्या प्रजा आहोंत. त्यांच्या ह्या राज्याचें उत्पन्न बाहात्तर कोटींचें आहे. त्यांच्या राज्यांत आपणांस सुख मिळतें, शांति मिळते, न्याय मि-ळतो, आणि स्वातंत्र्य मिळतें, ह्याबद्दल आपण त्यांचें निरं-तर कल्याण चिंतावें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे. महा-राणीसाहेबांविषयीं एक चांगला श्लोक आहे:—

सौख्याची पूर्ण खाणी चिरसमय असो आमची मुख्य राणी
आह्मांला हे शिराणी ह्मणुनि निजमुखें लोक गाऊत गाणीं
कीर्ती सर्वत्र ठाणीं सबलहि बघुनी सोडिती शत्रु पाणी
व्हिक्टोरीआ निशाणी धरुनि चहुंकडे चालती शुद्ध नाणीं.

---

# सामाजिक परिषद.

मुलांनो,

राष्ट्रीय सभा प्रत्येक दिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत भरत असते, त्यानंतर तेथेंच सामाजिक परिषद ह्मणून एक सभा आलीकडे साहासात वर्षें भरत असते. तिजमध्यें सामाजिक सुधारणेचा विचार होत असतो. ह्मणजे, आपल्या लोकांमध्यें धर्मसंबंधानें आणि आचारसंबंधानें जे भलभलते प्रघात बहुत दिवसांपासून चालत आले आहेत, त्यांचें निवारण कसें होईल, ह्याचें विवेचन होत असतें. त्यांत अनेक विषय निघतात; आणि त्यांवर अनेक विद्वान लोक भाषणें करितात. त्यांमध्यें, बालविवाह, हुंडा घेण्याचा परिपाठ, परदेशीं जाणें, इत्यादि विषयांचा ऊहापोह होतो. तेथें पुष्कळ चर्चा होते; आणि कांहीं नियमही ठरतात. परंतु, त्याप्रमाणें वागणें होत नाहीं. हें कां होत नाहीं ? ह्याचें उत्तर एवढेंच आहे कीं, हे नवे विचार आवडतात अशी मंडळी थोडी आहे, आणि हे आवडत नाहींत, अशी मंडळी, जुनी, ती फार आहे. तिचें प्रमाण हजारांत एकदेखील पुरतें वसावयाचें नाहीं. ह्मणून, नव्या विचारांप्रमाणें कोणी वागूं ह्मटलें कीं तो जातीच्या बाहेर पडावयाचा; त्याला सोयरेधायरे अंतरायाचे; आणि तो एकटा रहायाचा; फार झाले तर त्यांच्यासारखे पांचचारजण त्याला मिळायाचे. ह्मणजे त्याचे, प्रपंचसंबंधानें हाल व्हावयाचे; आणखी पुष्कळ लोकांत अपवाद व्हावयाचा तो

वेगळाच; ह्या भयानें नव्या विचाराप्रमाणें वागण्यास, ह्मणजे सामाजिक सुधारणा करण्यास धैर्य होत नाहीं. तेणेंकरून ही सगळी खटपट व्यर्थ गेल्यासारखी होते. हें एक मोठें संकट आहे. परंतु, ह्या कामीं कोणी तरी पुढार घेऊन, आणि क्लेश सोसून, आपल्या ऐहिक सुखाचा बळी दिला पाहिजे. एरव्हीं हें व्हावयाचें नाहीं. आपल्या देशांतले गौतमबुध, शंकराचार्य ह्यांचे इतिहास पाहा; अथवा युरोपांतल्या देशांतल्या ल्यूथर, जान नाक्स ह्यांचे इतिहास पाहा; ह्मणजे आह्मी सांगतों ह्याचें प्रमाण तुह्मांस पटेल. थोडे तरी गहूं मातींत टाकल्यावांचून पुष्कळ गहूं पिकावयाचे नाहींत. त्याप्रमाणें राष्ट्रामध्यें कोणी तरी आपल्या ऐहिक सुखाचा त्याग सद्रीतिप्रसारार्थ केल्यावांचून, ती सद्रीति राष्ट्रांत पसरावयाची नाहीं. आणि अशा प्रकारें सद्रीतीचा जो प्रसार होतो, त्याचें सगळें पुण्य, त्या माणसास मिळतें. ह्मणून खरे थोर आणि साधु जे आहेत, ते अशा कार्यांत आपल्या ऐहिक सुखाचा त्याग करण्यास मागेंपुढें पाहात नाहींत. ह्यास्तव, असे थोर पुरुष आमच्यामध्यें उत्पन्न झाले पाहिजेत, तरच आमच्या सामाजिक सुधारणेच्या वृद्धीची आशा आहे. आणखी असे पुरुष निर्माण होणें हें शिक्षणाच्या विशदतेवर अवलंबून असतें. अमकी गोष्ट चांगली आहे, ती करणें हें आपलें कर्तव्य आहे, ती न करणें हें मरण आहे—असें मनांत भिनतें, त्यांचेच हातून, आह्मी सांगितला आहे तसा स्वसुखाचा त्याग होतो.

---

## प्रजेला शाहाणपण पाहिजे.

मुलांनो,

कुटुंबांत जसा मोठा मनुष्य मुख्य असतो, तसा देशांत राजा हा मुख्य असतो. कुटुंबांतला मुख्य मनुष्य चांगल्या रीतीनें वागत असला, घरांतल्या माणसांचा सांभाळ करीत असला, तर त्याला इतर माणसें भजतात, आणि त्याच्या आज्ञेत चालतात. तोच मनुष्य वाईट रीतीनें वागूं लागला, घरच्या माणसांस जपेनासा झाला, मूर्खपणा करूं लागला, तर, त्याला घरांतलीं माणसें विचारीत नाहींत, त्याची हेळसांड करितात, आणि त्यानें तितका वेडेपणा आरंभला तर त्याला कोंडून देखील ठेवितात. हाच प्रकार राजाविषयीं होतो. राजाचें काम हें आहे कीं, त्यानें प्रजेचें पालन करावें, प्रजेस सुख होईल असें वागावें. तसें न करितां तो बेबंद वागूं लागला, आणि प्रजेच्या सुखाची हयगय करूं लागला, ह्मणजे तो लोकांस आवडेनासा होतो, तो त्यांना नकोसा होतो. ते त्याला गादीवरून काढतात, किंवा कधीं कधीं ठार देखील मारतात. ह्याचीं मोठीं दोन उदाहरणें इतिहासांत आहेत. इंग्लंडदेशाचा राजा पहिला चार्लस हा लोकांस आवडेनासा झाला; त्यास त्यांनीं, इ० स० १६४९ ह्या वर्षी, शिरच्छेद करून ठार मारिलें. त्याप्रमाणेंच फ्रान्साचा राजा सोळावा लुई ह्याचा त्रास लोकांस आला. त्यांनीं त्याला इ० स. १७९३ ह्या वर्षी, शिरच्छेद करून ठार मारिलें. ह्यांत सगळा अपराध त्या राजांचा होता, प्रजेकडे कांहीं दोष नव्हता, असें ह्मणतां येत नाहीं.

परंतु, राजांकडे विशेष दोष होता, हें खचीत आहे. तो दोष म्हणजे हा कीं, त्यांनीं आपलें कर्तव्य केलें नाहीं. आपल्या प्रजाजनांच्या सुखास ते जपले नाहींत.

असें राजांस मारणें हें कांहीं चांगलें नव्हे. तें कृत्य अमर्याद आहे. पण तें निरुपायास्तव करावें लागतें. पण तें करण्यास प्रजेस शाहाणपण पाहिजे. तें हिंदुस्थानांतल्या प्रजांस नाहीं, असें वाटतें. महमूद तघलख इतक्या मूर्खपणानें वागला, तरी त्याला कोणीं कांहीं केलें नाहीं. दुसरा बाजीराव ह्यानेंही असा पुष्कळ मूर्खपणा केला, तरी, त्याला प्रजेनें कांहीं फट म्हटलें नाहीं. त्यामुळें सगळ्या देशाची हानि झाली आहे. स्वराज्यें नष्ट झालीं आहेत, आणि परराज्याचें मोठें ओझें वाहण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे.

म्हणून प्रजेला शाहाणपण पाहिजे. राजा आपलें काम बरोबर रीतीनें करीत आहे—प्रजापालन बरोबर रीतीनें करीत आहे—तोंपर्यंत त्याला वडील माणसांप्रमाणें, देवाप्रमाणें भजावें, हें आवश्यक आहे. परंतु, तो प्रजेच्या सुखाकडे दुर्लक्ष करूं लागला, आपला दुराग्रह खरा करूं लागला, आणि प्रजेस त्रासवूं लागला, तर प्रजेनें त्यास, आपल्या वजनानें, राजनीतीनें वागायास लावावें, आणि त्याशीं सख्य करून, राष्ट्राचें कल्याण करावें.

घरचा मुख्य माणूस म्हणजे कांहीं देव नव्हे; तो इतर माणसांसारखाच माणूस आहे. हें जसें लोकांस कळतें, तसें हेंही कळलें पाहिजे कीं, राजा हा कांहीं देव नव्हे; तो आपल्यांतलाच कोणी एकजण आहे; हें खरें ज्ञान आहे.

## हिंदुस्थानाच्या उत्पन्नाची वासलात.

मुलांनो,

आपल्या हिंदुस्थानाची आपणांस माहिती असणें आवश्यक आहे. ती ताजी असावी तितकी चांगली. हिंदुस्थानाचें एकंदर क्षेत्रफळ, ब्रह्मदेशासुद्धां, १५८७०६४ चौरसमैल आहे, आणि लोकसंख्या २८८१५९६७२ आहे. ह्यांत, खास इंग्लिश सरकारच्या ताब्यांतल्या मुलुखाचें क्षेत्रफळ ९४४१०८ चौरसमैल आहे. इंग्लिश सरकारचें उत्पन्न ८८१३८०००० रुपये आहे, आणि खर्च ८८२२१०००० रुपये आहे. जमेपेक्षां खर्च १४७००० रुपये अधिक आहे. हा खर्च अधिक होण्याचें कारण असें आहे कीं, सरकारचे मुख्य कामदार साहेब लोक आहेत, ते विलायतेहून येतात, त्यांस पगार फार मोठे द्यावे लागतात. हिंदुस्थानाचे गव्हरनर जनरल ह्या एकट्यांस दरमहां पगार वीस हजार रुपये आहे, आणि आपल्या मुंबईच्या गव्हरनरास दरमहां दाहा हजार रुपये दरमहा आहे. शिवाय, त्यांच्या घरचा सगळा खर्च त्यांना वेगळा मिळतो. शिवाय हिंदुस्थानाच्या लष्कराचा खर्च फार मोठा आहे! दरसाल लष्कराकडे चौपन पंचावन कोटि रुपये त्यांस लागत आहेत! बाकी राहिले तीस तेतीस कोटि, त्यांत बाकीचे खर्च भागवायाचे; तेव्हां उत्पन्न खर्चांत पुरत नाहीं, ह्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. खर्चास उत्पन्न पुरत नाहीं, ह्मणून नवनवे कर बसविण्याचे विचार निघत आहेत. हिंदुस्था-

नांत इंग्लिश कामदारांस पगार फार मोठे आहेत. इतके पगार पृथ्वीच्या पाठीवर दुसऱ्या कोणत्याही देशांत नाहींत. हे पगार कमी करावे, लष्कराचा खर्च कमी करावा, असें सगळे लोक सरकाराला सांगत आहेत. पण सरकार ऐकत नाहीं.

हिंदुस्थानांत आगगाडीचा रस्ता १७५०० मैल बांधलेला आहे. त्यावर गाड्या चालल्या आहेत.

गतवर्षी हिंदुस्थानांत, बाहेरच्या देशांहून माल एकंदर, ६६५८३००००रुपयांचा आला, आणि १०३५५५००००रुपयांचा माल हिंदुस्थानाबाहेर इतर देशांत गेला. देशांतून पुष्कळ माल बाहेर जाणें हें देशास हितावह आहे, किंवा बाहेरचा पुष्कळ माल देशांत येणें हें हितावह आहे, हा एक मोठा वाद आहे. ह्याचा अद्याप उलगडा झाला नाहीं.

त्याप्रमाणेंच हिंदुस्थान श्रीमंत होत चाललें आहे कीं गरीब होत चाललें आहे, हा एक मोठा वाद आहे. डाक्टर मर्डाकसारखे कांहीं लोक ह्मणतात कीं, हिंदुस्थान श्रीमंत होत चाललें आहे, आणि शेट दादाभाई नौरोजी एम. पी. सारख्या पुष्कळ थोर पुरुषांचें ह्मणणें असें पडतें कीं, हिंदुस्थान गरीब होत चाललें आहे. ह्यांत शेट दादाभाईचेंच ह्मणणें विशेष खरें असलें पाहिजे. कां कीं, द्रव्याचा समुद्रासारखा प्रवाह बाहेर वाहात चालला आहे, हें आपण धडधडीत पाहात आहों.

---

# हिंदुस्थानांतले व्यापारधंदे.

मुलांनो,

इंग्लिशांचें राज्य ह्या देशांत स्थापित झाल्याच्या योगानें आमचीं स्वराज्यें नष्ट झालीं, ही एक मोठी हानि झाली आहे खरी. परंतु, त्याही हानीपेक्षां एक मोठी हानि झाली आहे. ती ही कीं, आपल्या देशांतले कारखाने बंद पडले, आणि कलाकौशल्य लयास गेलें आहे. बहुतेक सगळ्या वस्तु विलायतेहून तयार होऊन येऊं लागल्या आहेत. तुमच्या आंगावरचें कापड, तुमच्या पायांतले बूट, तुह्मी नेसतां ते मुगटे, तुह्मी दररोज रात्रीं पेटवितां त्या आगकाड्या, घड्याळें, हत्यारें, हांड्याझुंबरें, सुया, दोरा, लिहिण्याचे टांक, शाई, कागद, मुलांचीं खेळावयाचीं चित्रें, हीं सगळीं विलायतेहून येऊं लागलीं आहेत. ह्यामुळें हे पदार्थ तयार करण्याची सगळी मजूरी विलायतच्या लोकांस मिळूं लागली आहे. आणि त्यामुळें आमच्या देशांतले लोक उपाशीं मरूं लागून, कारखाने बसले आहेत. आणखी इंग्लंडास हिंदुस्थानांतून जो पैसा मिळतो, तो मुख्यत्वेंकरून व्यापारानें मिळतो. इंग्रजांतला मोठा ग्रंथकार लार्ड मेकाले ह्मणतो कीं, हिंदुस्थानांतलें आमचें इंग्लिशांचें राज्य गेलें तर क्षणभर फिकीर नाहीं; पण, आह्मां इंग्लिश लोकांचा माल हिंदुस्थानच्या लोकांनीं घेतला ह्मणजे बस आहे. एवढा लाभ व्यापारापासून, इंग्लंडास हिंदुस्थानापासून होत आहे. आणि

तितकीच हानि हिंदुस्थानाची होत आहे. हिचें निवारण करण्यास उपाय एवढाच कीं, त्या देशांत उत्पन्न झालेला माल खपे असे प्रयत्न करावयाचे. ह्या प्रयत्नांस कांहीं मंडळी लागली आहे. ह्यांचे पहिले पुढारी कै. गणेश वासुदेव जोशी हे होते. ते सगळे कपडे देशी घेत असत. हा प्रयत्न चांगला आहे. परंतु तो सगळ्या राष्ट्राच्या ह्मणजे हिंदुस्थानांतल्या सगळ्या माणसांच्या—तीस कोटि माणसांच्या—मनांत आला पाहिजे. हें काम फार कठिण आहे. वाऱ्याची मोट बांधण्यासारखी आहे. परंतु असाध्य नाहीं—दुष्कर नाहीं. हा प्रयत्न आलीकडे बराच सफल होत चालला आहे. त्याचें एक लहानसें प्रमाण हें आहे कीं ह्या देशांत गिरण्या स्थापित होऊन, त्यांत माल तयार होऊन थोडथोडा विकीत आहे. परंतु, विलायतेला यंत्रसाह्य पुष्कळ आहे, तसें हिंदुस्थानाला नाहीं. त्यामुळें बरोबरी करण्यास कठिण पडतें. तथापि असाच प्रयत्न केला असतां, परमेश्वरकृपेनें, यश येईल, अशी आशा आहे. बाहेरून माल येतो, त्यावर चांगली चापून जकात बसविल्यानें ह्या कार्यास पुष्कळ साह्य मिळणार आहे. परंतु, तें इंग्लंडास इष्ट नाहीं. परदेशचा माल खपेनासा झाला ह्मणजे इंग्लंडांतले कारखाने बसतील, असें भय आहे. आणि इंग्लंड ह्मणजे आमचे राज्यकर्ते. तेव्हां त्या दिशेनें साह्य होण्याची आशा कमी आहे.

---

## महाराणी सरकाराचे मुख्य प्रधान.

मुलांनो,

इंग्रजसरकाराच्या मोठ्या राज्यामध्यें जे लक्षावधि सरकारी कामदार आहेत, त्यांत महाराणीसाहेबांचे मुख्य प्रधान हे श्रेष्ठ होत. ह्यांचेएवढा मोठा कामदार दुसरा नाहीं. ह्यांची नेमणूक महाराणीसरकार करितात, आणि त्यांस प्रधानमंडळ बनविण्यास सांगतात. त्या प्रधानमंडळांतला एक एक प्रधान एका एका खात्यावर मुख्य नेमलेला असतो, आणि तो आपल्या कामाविषयीं अगदीं मुखत्यार असतो; तरी, त्यांतलीं मोटमोठीं प्रकरणें जीं असतात, तीं मुख्य प्रधानाच्या कानावर घालून, त्याच्या सल्ल्यानें त्यांचा निकाल करावा, असा परिपाठ आहे. त्याप्रमाणें वेगळ्या वेगळ्या खात्यांतल्या मोठमोठ्या जागाही मुख्य प्रधानाच्या संमतानेंच भराव्या लागतात. ह्मणजे, मुख्य प्रधानाच्या हातांत फार मोठमोठ्या जागा भरावयाचा अधिकार असतो. हिंदुस्थानाचे व्हाइसराय आणि इलाख्यांचे गव्हरनर ह्यांच्या नेमणुका तेच करितात. एवढेंच केवळ नव्हे, तर, नवे लार्ड बनविणें, नव्या पदव्या देणें, नवे मानकरी उत्पन्न करणें, ह्या सगळ्या गोष्टींस मुख्य प्रधानाची शिफारस लागते. ऐर्लंडचे लार्ड लेफ्टनेंट, परराज्यांतल्या दरबारांतले वकील, ह्या सगळ्यांच्या नेमणुका त्यांच्या हातच्या आहेत. मुख्य प्रधान हा पार्लमेंट सभेचा पुढारी आहे, आणि सगळीं मोठीं कामें त्याच्या अभिप्रायाप्रमाणें चालतात. असें आहे तरी, इतर प्रधानांपेक्षां त्याला अमका एक अधिकार अधिक आहे, असें कोठें कायद्यांत सांगितलेलें नाहीं. आ-

णखी ही मुख्य प्रधानगिरीची जागा अशी कांहीं चमत्कारिक झाली आहे कीं, त्या जागेवर मनास येईल त्याला नेमण्यास जरी राणीसरकाराला मोकळीक आहे, तरी, व्यवहाररीत्या, ती जागा पाहिजे त्या माणसास पतकरतां येत नाहीं. अंगीं सामर्थ्य असेल, तोच ती पतकरील—इतरांस ती नको ह्मणावी लागेल—असें झालें आहे. कां कीं, ती जागा पतकरल्यावर उगाच अधिकार गाजवीत स्वस्थ बसायाचें नाहीं आहे. तर, प्रधानमंडळ नवें करावयाचें, त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांजकडे कामें सोंपवायाचीं, तीं बरोबर रीतीनें करवायाचीं, आणि त्या वेळीं ज्या काय अडचणी आल्या असतील, त्या दूर करायाच्या, आणखी, पुष्कळ लोकांस पसंत पडेल अशा रीतीनें राज्य चालवायाचें, असें मोठें काम करायाचें आहे. हें परम कठिण आहे. तें साधारणांस कधीं यावयाचें नाहीं. ह्मणून, प्रधान नेमण्याच्या कामांत महाराणीसरकारास मुखत्यारी आहे, ह्या ह्मणण्याचा अर्थच असा आहे कीं, खरोखर राज्यकारभार चालविण्यास सर्वांत जो समर्थ असेल, त्यासच मुख्य प्रधान नेमिलें पाहिजे. अशी स्थिति प्राप्त होणें हें राष्ट्राच्या उत्तमावस्थेचें लक्षण आहे. ह्मणजे, राणीसाहेबांनीं पाहिजे तें करावें असें नाहीं; तर, जें योग्य आहे, तेंच केलें पाहिजे—ह्मणजे जें उत्तम असेल तेंच केलें पाहिजे. आणि त्यावरूनच "राजा कधीं अन्याय करीतच नाहीं" अशी एक ह्मण इंग्रजींत पडली आहे. ह्मणजे, दरबारच्या सगळ्या बऱ्यावाईट गोष्टींचें यशापेश मुख्य प्रधानावर आहे.

---

# कानसर्व्हेटिव्ह आणि लिबरल.

**मुलांनो,**

कोणत्याही राष्ट्रांत पाहिलें तरी दोन पक्ष असतात; एक जुना आणि एक नवा. जुन्यास असें वाटत असतें कीं, आपलें जें काय पहिल्यापासून चालत आलें आहे, तेंच पुढें चालवावें, त्यांत फेरफार करूं नये; आणि नव्यांस असें वाटत असतें कीं, माणसें दिवसेंदिवस शाहाणीं होत चाललीं आहेत, त्यांबरोबर, जुन्या संस्थांत फेरफार करून, त्या नव्या माणसांच्या सोईच्या आणि सुखवृद्धीच्या केल्या पाहिजेत. असे पक्ष सध्या आमच्या इंग्लिश सरकारच्या विलायतच्या दरबारांत कितीएक शतकांपासून चालले आहेत. एकाचें नांव कानसर्व्हेटिव्ह आणि दुसऱ्याचें नांव लिबरल, असें आहे. ज्या पक्षाचा वर्चष्मा होतो, त्या पक्षाच्या लोकांचें राजप्रधानमंडळ बनतें; आणि दुसरा पक्ष त्यास विरुद्ध होतो. ह्यानें कांहीं हानि होत नाहीं. अवयवांच्या व्यायामानें जसें शरीर बळकट आणि निरोगी होतें, तसें, ह्या पक्षकलहानें दरबारांतलें किल्मिश नाहींसें होऊन, राज्यास मजबुदी येते, आणि प्रजाजनांचें हित होतें.

ह्या दोन पक्षांत कोणी तरी पुढारी असतात; आणि, ते पुढारी आपापल्या पक्षाच्या सरशीच्या वेळीं सरकाराचे मुख्य प्रधान होतात. असे जे पुढारी आजपर्यंत झाले आहेत, ते बहुतेक सगळे मोठे कर्ते आणि राजकार्यधुरंधर होते. त्यांनीं आपापल्यापरी सरकारचीं कामें उत्तम प्रकारें करून आपली कीर्ति मागें ठेविली आहे. सध्याच्या काळीं कानसर्व्हेटिव्ह पक्षाचे जे पुढारी आहेत, त्यांमध्यें लार्ड सालि-

सबरी हे प्रमुख आहेत. हे मोठे विद्वान आहेत. आणि इ० स० १८८५ पासून इ० स० १८९१ पावेतों, महाराणीसरकारच्या दरबारांत मुख्य प्रधान ते होते. ह्यांचें वय आज सेसष्ठ वर्षांचें आहे. त्यांनीं प्रधानकीचें काम उत्तम चालविलें.

सध्या लिबरल पक्षाचे जे पुढारी आहेत, त्यांत ग्ल्याडस्टन साहेब हे प्रमुख आहेत. इ० स० १८९२ ह्या वर्षी, दरबारांत कानसर्व्हेटिव्ह पक्षाचा पराभव होऊन, लिबरल पक्ष पुढें सरसावला. तेव्हां हे महाराणीसाहेबांचे मुख्य प्रधान झाले. अशा प्रकारें हे आतां चौथ्यानें मुख्य प्रधान झालेले आहेत. हे मोठे ग्रंथकार आहेत, मोठे वक्ते आहेत, मोठे धर्मनिष्ठ आहेत, आणि मोठे राजकारस्थानी आहेत. हे इ० स० १८०९ ह्या वर्षी जन्मले. त्यांचें वय आज ८४ वर्षांचें आहे. आणि ते आज बावन्न वर्षे एकसारखे पार्लमेंटाचे सभासद आहेत. हे फार उदार मनाचे आहेत. आणि जगांतले सगळे व्यवहार न्यायास अनुसरून व्हावे— सर्व माणसांच्या हक्कांचें रक्षण व्हावें—अशी त्यांची फार इच्छा आहे. तिच्या परिपूर्णतेसाठीं ते नेहमीं झटत असतात. ऐर्लंडास, त्याच्या स्वतःच्या कार्यांपुरतें स्थानिकस्वराज्य द्यावें ह्मणून ते भगीरथ प्रयत्न करीत आहेत. आणखी हिंदुस्थानांतल्या राष्ट्रीय सभेविषयीं त्यांचें मत फार चांगलें आहे. इंग्लिश सरकाराच्या हातून जर कधीं हिंदुस्थानाचें कल्याण व्हावयाचें आहे, तर, तें ह्या लिबरल पक्षाच्या साह्यानें होईल.

## पार्लमेंट सभा.

मुलांनो,

पार्लमेंट सभा इंग्लंडांत आहे. तिच्या अनुमतानें महाराणी सरकार आपल्या राज्याचा कारभार चालवितात. ह्या सभेचे मुख्य दोन भाग आहेत; लार्डांची सभा, आणि कामन्सांची सभा.

लार्डांची सभा ह्मणजे मानकऱ्यांची सभा. हींत सगळे मानकरी पिढीजाद असतात. हींत सध्यां ५७० सभासद आहेत. ६ राजकुलोत्पन्न संबंधी आहेत; २ आर्च बिशप आहेत; २२ ड्यूक आहेत; २२ मार्किस आहेत; १२० अर्ल्स आहेत; २६ व्हायकौंट आहेत; २४ बिशप आहेत; ३०४ ब्यारन आहेत; १६ स्काटलंडसंबंधी मानकरी आहेत; २८ ऐर्लंडसंबंधी मानकरी आहेत.

कामन्सांची सभा ह्मणजे प्रांतोप्रांतींच्या लोकांनीं आपल्या वतीनें निवडून दिलेल्या लोकांची सभा. हींत सध्या ६७० सभासद आहेत. पैकीं, इंग्लंडच्या वतीचे ४६५ आहेत; वेल्सच्या वतीचे ३० आहेत; स्काटलंदच्या वतीचे ७२ आहेत; आणि ऐर्लंडाच्या वतीचे १०३ आहेत.

ह्या सभासदांची निवड होते, तेव्हां मोठमोठ्या लोकांची फार ओढाताण होते. आपल्या इलाख्याचे माजी गव्हरनर सर रिचर्ड टेंपल हे, मुदत भरण्याच्या आधींच, गव्हरनरच्या कामाचा राजीनामा देऊन, उड्या घालीत विलायतेस, पार्लमेंटाचे सभासद होण्याकरितां गेले होते. परंतु, त्यांची उडी चुकली, त्यांस पुष्कळ मतें मिळालीं नाहींत.

ह्मणजे, सांगायाचें एवढेंच कीं इकडच्या गव्हरनरीपेक्षां पार्लमेंटाचे सभासद होणें हें अधिक मानाचें आहे. ह्या निवडीमध्यें अनेक पक्ष असतात. ज्या पक्षाचे सभासद पुष्कळ असतात, त्या पक्षाचें दरबार सिद्ध होतें, आणि त्याच्या धोरणानें राज्यकारभार चालतो. ह्या पक्षांत दोन मुख्य आहेत; कानसर्व्हेटिव्ह आणि लिबरल. ह्यांच्या निवडीची कधीं कधीं फार मौज होत असते. इ० स० १८८५ ह्या वर्षी निवड झाली, तेव्हां कानसर्व्हेटिव्ह ३३५ होते, आणि लिबरलही ३३५ होते. इ० स० १८८६ ची निवड झाली, तेव्हां कानसर्व्हेटिव्ह ३९३ होते, आणि लिबरल २२७ झाले. इ० स० १८९२ ह्या वर्षी निवड झाली, तीवरून, कानसर्व्हेटिव्ह ३१४ झाले, आणि लिबरल ३५६ झाले. ती स्थिति सध्या चालली आहे. ह्यांत पुढाऱ्यांवरूनही पोटपक्षांस नांवें पडलीं आहेत. ग्लाडस्टन साहेबांच्या मताचे आहेत, त्यांस ग्ल्याडस्टोनियन असें नांव पडलें आहे. पार्नेल ह्याच्या मताचे आहेत, त्यांस पार्नेलाइट असें नांव पडलें आहे. ह्मणजे, रामदासी, रामानुज, गोरखपंथी, ही जशी परंपरा आहे, तशी ही कांहींशी दिसते. सध्याच्या पार्लमेंटांत ग्ल्याडस्टोनियन २७३ आहेत. ह्या १८९२ च्या निवडीच्या वेळींच नामदार शेट दादाभाई नौरोजी ह्यांस सेंट्रल फिन्सबरीच्या लोकांनीं आपल्या वतीनें सभासद नेमिलें आहे. पार्लमेंटांत पाय लागले, असे हे हिंदुस्थानांतले पहिलेच गृहस्थ आहेत.

---

## स्थानिकस्वराज्यव्यवस्था.

मुलांनो,

हा शब्द मराठी भाषेंत नवा आहे. कां कीं ही संस्थाच आपल्यांत नवी आहे. गांवच्या लोकांनीं आपल्या सोई आपल्या पैशानें आपण स्वतः करून घ्याव्या, त्या कृत्यास सरकाराचा आश्रय मात्र असावा, अशी जी व्यवस्था लार्ड रिपन ह्यांनीं नवा कायदा करून आमच्या देशांत चालू केली आहे, तीस स्थानिकस्वराज्यव्यवस्था ह्मणतात. हिच्या मुख्य शाखा दोन आहेत. म्युनिसिपालिट्या, आणि लोकलबोर्डें. म्युनिसिपालिट्या ह्या गांवांतल्या घरांवर आणि व्यापारावर कर बसवून पैसा उत्पन्न करितात. आणि लोकलबोर्डांस पैसा मिळण्याकरितां जमिनीच्या साऱ्यावर सरकारानें रुपयामागें १ आणा लाविला आहे, त्याचा पैसा उत्पन्न होतो. म्युनिसिपालिट्या आपल्या पैशांतून गांवचा स्वच्छपणा राखितात, रस्ते साफ ठेवितात, आणि शाळा संभाळितात. लोकलबोर्डें जीं आहेत, त्यांस त्या एक आण्यांतल्या चार पै लोकांच्या विद्यावृद्धीकडे खर्चावयाच्या असतात, आणि आठ पै सडका, धर्मशाळा, विहिरी, दवाखाने, इत्यादिकांकडे लावावयाच्या असतात. म्युनिसिपालिट्या आणि लोकलबोर्डें ह्यांचीं कामें चालविण्यास लोक निवडण्याचा अधिकार लोकांस आहे. त्याप्रमाणें निवड होत असते. आणि अशा निवडलेल्या लोकांच्या हातीं सगळे अधिकार देऊन काम चाललेलें असतें. तरी मुख्य अधिकारसूत्रें कलेक्टरांच्या हातीं असतात. आणखी, सर्व गोष्टी बहुमताप्रमाणें व्हाव्या, असें जरी आहे, तरी, बहु-

मत करण्यांत खटपटी पुष्कळ असतात. त्यांत खासगत द्वेषदावे, पक्ष, अभिमान, मत्सर, इष्ट ह्यांचें प्राबल्य पुष्कळ असतें. त्यामुळें, आंतल्या आंत तट असतात. त्यामुळें कामें कशींबशीं रडतकडत चालतात. चांगलीं चालत नाहींत. ही गोष्ट सरकाराच्या दृष्टोत्पत्तीस आली आहे. आणि त्याबद्दल त्यांस फार वाईट वाटत आहे. परंतु, सध्याच्या स्थितींत त्यांचा कांहीं उपाय चालत नाहीं. कांहीं नियमांनीं सभासद निवडण्याचा अधिकार अजाण आणि भितऱ्या अशा कांहीं लोकांच्या हातीं गेला आहे. त्यामुळें भलत्याच लोकांची निवड कधीं कधीं होते. ते आपल्या कृतीनें, हरतऱ्हा करून, आपलेकडचें बहुमत करतात, आणि चांगल्या समजदार लोकांचें चालूं देत नाहींत. असें चालल्यामुळें चांगल्या माणसांस त्या कामांत पडण्यास नकोसें वाटतें. आणि त्यांनीं आंग काढून घेतल्यामुळें बाकीच्या माणसांच्या हातून कामें चालतात तीं कशीं चालावीं, ह्याचें सहज अनुमान होण्यासारखें आहे. ह्यामुळें पैसा खर्चून लोकांस व्हावें तसें सुख होत नाहीं. ह्या अरिष्टाच्या निवारणास उपाय एवढाच आहे कीं, सभासदांची निवड जी करायाची, ती, खासगत द्वेषदावे एकीकडे ठेवून, खरोखर चांगल्या माणसांची करावी. द्वेषदाव्यांवरून जर गाडीवाला अडाणी निवडला, तर, गाडींतल्या सगळ्या—म्हणजे चांगल्या आणि वाईट अशा सर्व—लोकांवर अरिष्ट यावयाचें आहे, हें लक्षांत ठेवावें. विसरूं नये.

---

## आपलें कर्तव्य करावें.

मुलांनो,

तुम्ही विद्या शिकतां आहां, तिनें जर तुम्ही आपलें पोट भरलें, आणि कुटुंबाचा चरितार्थ चालविला, तर कांहीं विशेष केलें असें नाहीं. पोट भरणें आणि आपल्या जिवलगांस पोसणें हें कृत्य जे कोणी विद्या शिकत नाहींत–अक्षरशत्रु आहेत–पशु आहेत–ते देखील करीत आहेत. तेवढेंच करून तुम्ही स्वस्थ राहिलां–आणखी त्याच्या पलीकडे कांहीं केलें नाहीं–तर तुम्ही आणि पशु सारखे झालां. तर, असें करूं नका. पशु होऊं नका. आपल्या निर्वाहाच्या पलीकडे–आपल्या देशबांधवांकरितां–आपल्या राष्ट्राकरितां कांहीं तरी करा. तुम्ही ह्मणाल कीं आम्ही लहान, आम्ही आमच्या राष्ट्राचें बरें काय करणार? तर हें लक्षांत ठेवा कीं, आपल्या लोकांत ज्या गोष्टी पाहिजेत आहेत–ज्या गोष्टीवांचून आपल्या राष्ट्राचें कल्याण खरोखर खोळंबलें आहे–त्या गोष्टींपैकीं एका गोष्टीचा एक लक्षावा किंवा एक परार्धावा हिसा जरी तुमच्या हातून झाला, तरी तुम्ही आपल्या देशाच्या उपयोगीं पडलां असें होणार आहे. सगळेच जार्ज वाशिंग्टन व्हावयाचे नाहींत. सगळेच रामशास्त्री व्हावयाचे नाहींत. परंतु, हा आपला देश पतित झाला आहे, सर्वोपरी मागें पडला आहे, अत्यंत लाजिरवाण्या स्थितींत आहे, ही गोष्ट अगदीं अल्प प्रमाणानें जरी तुम्ही आपल्या मंडळीच्या मनांत भरवून दिली, आणि तिच्या निवारणाचे उपाय नुसते त्यांच्या कानांवर घातले,

तरी, फार मोठी पेरणी होणार आहे, [illegible]चें पीक यथाकालीं सहस्रपट किंवा लक्षपट येणार [illegible] तुह्मांस जें करावयाचें आहे तें हें कीं, आपल्या [illegible] पाऊल विद्याचारसंपन्न मार्गांत थोडें एक केंसभर [illegible]ढें पडे, असे उपाय तुह्मी हस्तें परहस्तें करवतील [illegible] करा. आपल्या राष्ट्राची उन्नतावस्था जर कधीं प्रा[illegible]याची असली, तर ती विद्येच्या प्रसारानें होईल, आ[illegible] आपण ज्ञान संपादणें व आपल्या संगात्यांस ज्ञा[illegible]ायास लावणें हा ज्ञानप्रसाराचा मार्ग आहे. [illegible]तरी हें जग सोडून जावयाचें आहे. तें कुतऱ्याम[illegible]प्रमाणें, जसे आले तसे गेले—खाल्लें, खेळले अ[illegible] मेले—कांहींएक केलें नाहीं, असें ह्मणून घेऊन मरा[illegible] त्यापेक्षां यथाशक्ति जेवढें होईल तेवढें करावें—तें म[illegible] करावें, शब्दांनीं करावें किंवा हातांनीं करावें. त्याचा [illegible]शेष—र-कम लहान असल्यामुळें—येथें जरी कोणास क[illegible] नाहीं—त्याबद्दलची शाबासकी तुह्मांला येथें जरी [illegible]ीं दिली नाहीं—तरीं, वर खड्यानखडा टिपलेला आहे. तेथें श्र-माचें बक्षीस खचीत खचीत मिळावयाचें आहे आणि त्याचा परिणाम आपल्या राष्ट्रावर प्रत्यक्षतः किंव परंपरया केव्हां तरी व्हावयाचा आहे. आणखी, आप[illegible] कर्तव्य केलें—आपण आपलें काम केलें आहे, अशा [illegible]ारानें जें अपूर्व समाधान येथें होतें, तो त्या मोठ्या [illegible]क्षिसाचा विसार आहे. तो विसार येथें एकांतांत घ्यावा, आणि तें बक्षीस घेण्यास आनंदानें जगत्पित्याकडे जावें याहून दुसरें काय करावयाचें !

---